**महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान**
**रत्नागिरी शहराच्या पाणी पुरवठा प्रकल्पाच्या कंत्राटामधील वस्तु व सेवा कराच्या समावेशनाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२३३/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक :- ०८ मे,२०२३**

**संदर्भ :-**

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र: नगरो २०१४/प्र.क्र.११९/नवि-३३, दिनांक २१ ऑगस्ट, २०१४.
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र: बैठक २०१६/प्र.क्र.३३२/नवि-३३, दिनांक १ ऑक्टोबर, २०१६.
३. नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे पत्र क्र: नपप्रसं २०२२/रत्नागिरी WSS नगरोत्थान GST/प्र.क्र.७७८/कक्ष-७/२००७, दिनांक २९ मार्च,२०२३.

**प्रस्तावना :-**

राज्यातील नागरी भागात मुलभूत पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी व त्यांचा दर्जा वाढविण्याकरिता संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयाच्या तरतूदीन्वये महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान राबविण्यात येत आहे.

०२. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियानांतर्गत **रत्नागिरी शहराच्या पाणी पुरवठा प्रकल्पास** संदर्भाधीन क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. नगर परिषद प्रशासन संचालनालय यांच्यामार्फत संदर्भाधीन क्रमांक ३ अन्वये शासनास सादर करण्यात आलेल्या रत्नागिरी शहर पाणीपुरवठा प्रकल्पाच्या वस्तु व सेवा कराच्या समावेशनास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत रत्नागिरी शहराच्या पाणीपुरवठा प्रकल्पास संदर्भाधीन क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्यात आलेली आहे. सदर पाणीपुरवठा प्रकल्पातील वस्तु व सेवा कराच्या समावेशनाच्या अनुषंगाने नगर परिषद प्रशासन संचालनालय यांच्यामार्फत संदर्भाधीन क्रमांक ३ अन्वये शासनास सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. या प्रकल्पातील संदर्भाधीन क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे होता :-

(रु. कोटी)

| अ. क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | प्रकल्पाची मंजूर किंमत | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ८५%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या १५%) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | रत्नागिरी नगरपरिषद | रु. ६२.९२६५ | रु. ५३.४८७५ | रु. ९.४३९० |

**सदर पाणीपुरवठा प्रकल्पाचा वस्तु व सेवा कराच्या समावेशनासह सुधारित वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे आहे :-**

**(रु.कोटी)**

| अ. क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | प्रकल्पाची मंजूर किंमत | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ८५%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या १५%) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | रत्नागिरी नगरपरिषद | रु. ६८.४९५५ | रु. ५८.२२११ | रु. १०.२७४४ |

**०३.** संदर्भाधीन क्र. २ या शासन निर्णयातील तरतूदी तसेच सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे रत्नागिरी नगरपरिषदेवर बंधनकारक आहे. तसेच, वस्तु व सेवा कराच्या समावेशनासह प्रकल्पाच्या सुधारीत वित्तिय आकृतीबंधानुसार अनुज्ञेय निधी प्रकल्पासाठी उपलब्ध करुन देण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संगणक संकेतांक २०२३०५०८१६४५२०६८२५ आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: cn=SHRIKANT C ANDGE, o=Mantralaya, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, email=shrikant.andge@nic.in, c=US
Date: 2023.05.10 15:38:47 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**उपसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक, गो. ते. रुग्णालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
८. विभागीय आयुक्त, कोकण पुणे.
९. जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
१०. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे विभाग.
११. जिल्हा प्रशासन अधिकारी, ठाणे.
१२. मुख्याधिकारी, रत्नागिरी नगरपरिषद, जि. रत्नागिरी.
१३. निवडनस्ती, नवि-३३.